**नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई या न्यायालयांमधील न्यायीक अधिकाऱ्यांच्या अस्थायी पदांना दि. १.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: अस्थायी-२०२५/प्र.क्र.८४/कार्या-१२**
पाचवा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २८ मार्च, २०२५.

वाचा -

(१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. अस्थायी-०२२४/प्र.क्र.४९/कार्या-११ दिनांक २३.०९.२०२४

(२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि- २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.

(३) नगर दिवाणी व सत्र न्यायालय यांचे पत्र क्र. सी/८२/४५९/२०२५, दि.१३.०२.२०२५.

**प्रस्तावना** :-

वाचा येथील अ.क्र. १ अन्वये राज्यातील नगर दिवाणी व सत्र न्यायालय , मुंबई येथील न्यायीक अधिकारी यांच्या १८ व कर्मचारी यांच्या २०८, अशा एकुण २२६ पदांना दि. १.०९.२०२४ ते २८.०२.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. अ.क्र.२ अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार दिलेले आहेत. यास अनुसरुन नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायीक अधिकाऱ्यांच्या अस्थायी पदांना दि. १.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची विनंती प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय यांनी अ.क्र. ३ अन्वये शासनास विनंती केली आहे. त्यानुषंगाने सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई या न्यायालयाचे कामकाज सुरळीत राहण्यासाठी

सदर न्यायालयामधील न्यायीक अधिकाऱ्यांच्या प्रपत्र "अ" मध्ये नमूद १८ अस्थायी पदांना दि. १.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, (००) १०५ दिवाणी व सत्र न्यायालय, (०१)(०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश (अनिवार्य) (२०१४ ०१६३) ०१- वेतन ” या लेखाशीर्षाखालील सन २०२५-२०२६ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ नुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-तीन मधील अ.क्र. ४ चा परिच्छेद क्र. २७ (२) मधील 'क' येथील वित्तीय शक्तीनुसार तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय कमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१८५१५१०८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL SHESHRAO AKHARE

Digitally signed by SUNIL SHESHRAO AKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=c55b6c504707142ddacf2e4222bba5fd769f8fabe09cfab3a389b22d9d2e954c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=864BAFED115354AB0BA49224724304588SDE886F58FCE5E92AF39B897208763E, cn=SUNIL SHESHRAO AKHARE
Date: 2025.03.28 18:52:43 +05'30'

**(सुनिल आखरे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
२. प्रबंधक, निरीक्षणे-१, मा. उच्च न्यायालय, मुंबई
३. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई .
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई /नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग/आ.पु.क., व्यय-५, अर्थसंकल्प-११ मंत्रालय, मुंबई.
८. विधि व न्याय विभाग, कार्यासन ११, २३ व २४.
९. निवड नस्ती

## प्रपत्र "अ"

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | अपर प्रधान न्यायाधीश | १ |
| २ | न्यायाधीश | ६ |
| ३ | न्यायाधीश | ३ |
| ४ | प्रधान न्यायाधीश (NDPS) | १ |
| ५ | न्यायाधीश (NDPS) | ४ |
| ६ | न्यायाधीश (SEBI) | १ |
| ७ | सत्र न्यायाधीश (RIOT) | २ |
| | एकूण | १८ |